प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी
कार्यालयांच्या सुधारीत आकृतीबंधास
मान्यता देण्याबाबत - नवीन पदांच्या
निर्मितीस मंजुरी

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्राविचौ-१४२३/प्र.क्र.५१/विचौ-२(११-अ)**
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक - १० जुलै, २०२४

**पहा :-**(१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र: एसपीओ-२८०७/प्र.क्र.२१/०७/११-अ, दि.२८.१०.२००९
(२) शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसपीओ-२८०७/प्र.क्र.२१/०७/११-अ, दि.१५.०२.२०१०

**प्रस्तावना:-**

राज्य शासकीय अधिकाऱ्यांविरुध्दच्या शिस्तभंगविषयक कार्यवाहीतील चौकशी पूर्ण करुन शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्यांना अहवाल सादर करण्यासाठी प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकाऱ्यांची यंत्रणा या विभागाच्या संदर्भाधीन क्र.(१) येथील शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आली आहे. या यंत्रणेवरील कामाचा भार दिवसेंदिवस वाढत असून चौकशी अधिकाऱ्यांकडून अधिकच्या कर्मचाऱ्यांची मागणी सातत्याने होत आहे. त्या अनुषंगाने प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांकडील प्रलंबित चौकशी प्रकरणांची संख्या विचारात घेता या कार्यालयांना अतिरिक्त कर्मचारी उपलब्ध करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या कार्यालयांकडे सध्या उपलब्ध असलेल्या २४ पदांच्या व्यतिरिक्त १२ नवीन पदांच्या निर्मितीस उच्च स्तरीय सचिव समितीने दि.३०.११.२०२३ च्या बैठकीत मान्यता दिली आहे. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :-**

कोकण, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद व अमरावती या ६ महसुली विभागांतील प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांच्या आस्थापनेवर खाली दर्शविलेल्या वेतनश्रेणींत, प्रत्येकी एक सहायक कक्ष अधिकारी आणि प्रत्येकी एक लिपिक-टंकलेखक अशी एकूण १२ पदे सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

| अ क्र | पदाचे नाव | वेतनश्रेणी रु. | एकूण पदे |
|---|---|---|---|
| १ | सहायक कक्ष अधिकारी | एस-१४: ३८६००-१२२८०० | ६ |
| २ | लिपिक-टंकलेखक | एस-६ : १९९००-६३२०० | ६ |

२. वरील पदे सामान्य प्रशासन विभागाच्या नियंत्रणाखाली राहतील. उपरोक्त पदे मंत्रालयीन विभागांतील कर्मचाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील.

प्रतिनियुक्तीच्या मार्गाने नियुक्तीसाठी लिपिक-टंकलेखक उपलब्ध न झाल्यास ही पदे आवश्यकतेनुसार विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन बाह्य-सहाय्यित यंत्रणेमार्फत पदे भरण्यात येतील.

दोन्ही संवर्गांच्या प्रकरणी, प्रतिनियुक्तीने पदे भरण्याबाबतची कार्यवाही विचौ-२ कार्यासनाच्या सहमतीने प्रचलित कार्यपध्दतीनुसार मंत्रालय संवर्ग नियंत्रण करणाऱ्या (प्रशा-३) कार्यासनाकडून करण्यात येईल.

३. वरील (१) येथील दि.२८.१०.२००९ च्या आदेशान्वये निर्माण करण्यात आलेली २४ पदे तसेच या शासन निर्णयान्वये निर्माण होणारी १२ पदे यांनुसार कोकण, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद व अमरावती

येथील **प्रत्येक प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयाचा आकृतिबंध पुढीलप्रमाणे राहील :-**

| अ.क्र | पदाचे नाव | वेतनश्रेणी रु. | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी | एस-२५ : ७८८००-२०९२०० वा त्यापेक्षा वरिष्ठ वेतनश्रेणी | १ |
| २. | लघुलेखक (निम्न श्रेणी) | एस-१४ : ३८६००-१२२८०० | १ |
| ३. | सहायक कक्ष अधिकारी | एस-१४ : ३८६००-१२२८०० | १ |
| ४. | लिपिक-टंकलेखक | एस-६ : १९९००-६३२०० | २ |
| ५. | शिपाई | एस-१ : १५०००-४७६०० | १ |
| | **एकूण पदे** | | **६** |
| | ६ प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांची **एकूण पदसंख्या - ३६** | | |

**वरील आकृतिबंधातील अनुक्रमांक २ येथील लघुलेखक (निम्न श्रेणी) (१ पद), अनुक्रमांक ४ येथील लिपिक-टंकलेखकाच्या २ पदांपैकी १ पद तसेच अनुक्रमांक ५ येथील शिपाई (१ पद) हया ३ पदांवर संबंधित विभागीय आयुक्तांमार्फत कर्मचारी उपलब्ध करुन देण्याची पूर्वीची पध्दत सध्या आहे तशीच सुरु राहील.**

४. सदर पदांचा वेतनादि खर्च मागणी क्र. ए-४ अंतर्गत २०५२, सचिवालयीन सर्वसाधारण सेवा,०९२ इतर कार्यालये, (०२) विभागीय चौकशीकरीता विशेष अधिकारी (दत्तमत) (अनिवार्य)

(०१) कोकण विभाग लेखाशीर्ष २०५२ ०१०५
(०२) पुणे विभाग लेखाशीर्ष २०५२ ०२९५
(०३) नागपूर विभाग लेखाशीर्ष २०५२ ०३०१
(०४) औरंगाबाद विभाग लेखाशीर्ष २०५२ ०३१२
(०५) नाशिक विभाग लेखाशीर्ष २०५२ ०३७५
(०६) अमरावती विभाग लेखाशीर्ष २०५२ ०३८४

या लेखाशीर्षाखाली मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय दि.३०.११.२०२३ रोजी झालेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या शिफारशीनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १५२/आ.पु.क./२०२४ दि. १२.०३.२०१४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७१०१६११२३८८०७ आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT SAJANIKAR

Digitally signed by PRASHANT SAJANIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=471c7cbe63d119adc5855a3c23ed95de986c1c7bc41d6f6cdd3767b3ebe74c82, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=217003E42C820EC29C89162937F98929453CC6295B34F71EA285041053A66AA7, cn=PRASHANT SAJANIKAR
Date: 2024.07.10 16:24:16 +05'30'

**( प्रशांत साजणीकर )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव,

मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव,
मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव,
मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव,
मा.उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव,
मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा,
मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद,
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव,
सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१ महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -२ महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल (लेखा परीक्षा) -१ महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल (लेखा परीक्षा) -२ महाराष्ट्र, नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, कोकण, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद व अमरावती
जिल्हा कोषागार अधिकारी, कोकण, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद व अमरावती
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख तसेच प्रादेशिक विभागप्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
वित्त विभाग, आ.पु.क., व्यय-४, अर्थसंकल्प-१४
सामान्य प्रशासन विभाग, अर्थसंकल्प शाखा
निवडनस्ती (विचौ-२)